**सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत कार्यरत अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन अदा करण्यासाठी अर्थसंकल्पित निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: मबाआ-२०१८/प्र.क्र.८६/का-७अ**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: १४ सप्टेंबर, २०१८.

**संदर्भ:-** १) शासन परिपत्रक वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि. २ एप्रिल, २०१८.
२) शासन परिपत्रक,महिला व बाल विकास विभाग क्र. बीजीटी- २०१८/प्र.क्र. ३३/का-४, दि. ५ एप्रिल, २०१८.

**प्रस्तावना:**

एकात्मिक बाल विकास सेवा योजना ही केंद्र पुरस्कृत योजना आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांचेमार्फत राबविण्यात येते. केंद्र शासनाने दिनांक ८/१२/२०१७ च्या आदेशान्वये एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत वेतन या बाबीकरिता केंद्र व राज्य हिस्स्याचे प्रमाण २५ :७५ असे केले आहे. केंद्र शासनाने सन २०१८-१९ या वर्षाकरिता वेतनाकरिता रु. ३१९.७८ कोटी एवढा निधी मंजूर केला असून त्यापैकी बदलेल्या प्रमाणानुसार केंद्र शासनाने त्यांचा हिस्सा रु. ७९.९४ कोटी एवढा देय केलेला आहे. सदर प्रमाण बदलतांना केंद्र शासनाने या योजनेअंतर्गत बाल विकास प्रकल्प अधिकारी, जिल्हा कार्यक्रम अधिकारी, सांख्यिकी सहायक, मुख्यसेविका/पर्यवेक्षिका इ. संवर्गातील पदांना वरीलप्रमाणे २५ टक्के वेतन त्यांच्या हिस्स्यातून देय केले आहे. उर्वरीत संवर्गातील पदांचे वेतन १०० टक्के राज्य हिस्स्यामधून अदा करणे आवश्यक आहे. सदर बाब दिनांक ५ जून, २०१८ रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीत विचारात ठेवण्यात आली होती. त्यास मा.मंत्रिमंडळाने मान्यता दिलेली आहे. केंद्र शासनाने बदलेल्या प्रमाणानुसार एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत कार्यरत अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन अदा करण्याकरिता नवीन लेखाशिर्ष घेण्याची कार्यवाही सुरु आहे. त्याप्रमाणे नवीन लेखाशिर्ष निर्माण होईपर्यत यापूर्वीच्या लेखाशिर्षामधून वेतनाकरिता निधी वितरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता माहे डिसेंबर २०१८ पर्यत नऊ महिन्याचा खर्च भागविण्यासाठी मागणी क्रमांक-एक्स-१ मुख्य लेखाशिर्ष २२३६- पोषण आहार अंतर्गत अर्थसंकल्पित निधीपैकी केंद्र शासनाच्या सुधारित मागदर्शक सुचना व वित्त विभागाच्या दिनांक २.४.२०१८ च्या परिपत्रकातील तरतुदीनुसार सदर शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्रामधील स्तंभ क्र-६ मध्ये नमूद केल्यानुसार अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे निधी वितरीत करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई हे राहतील त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. त्यानुसार आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक-१ येथील दिनांक २.४.२०१८ च्या परिपत्रकामध्ये नमूद केलेल्या तपासणी सूचीतील बाबींची, केंद्र शासनाच्या मागदर्शक सूचनांचे तसेच यासंदर्भात नियोजन विभाग व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, प्रचलित निकष, वित्तीय अधिकाराचे प्रत्यायोजन यांचे काटेकोर पालन करावे.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील दिनांक २.४.२०१८ च्या परिपत्रकामधील तरतुदीच्या अधिन राहून तसेच नियोजन व वित्त विभागाने दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१८०९०७१७३७३०८८३० असा आहे. सदरचा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, serialNumber=4ca059ab7b8d64aaf749fe58e0a714a015f521cb28fd2204e49a4d81f12a5745, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2018.09.27 11:50:54 +05'30'

**( ला.रा.गुजर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई
२) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे
३) महालेखापाल १/२, ( लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर
४) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ( आयुक्तालय,ए.बा.वि.से.यो.नवी मुंबई मार्फत )
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई शहर/मुंबई उपनगर
६) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, ( आयुक्तालय,ए.बा.वि.से.यो.नवी मुंबई मार्फत )
७) सर्व तालुका कोषागार अधिकारी( आयुक्तालय,ए.बा.वि.से.यो.नवी मुंबई मार्फत )
८) सर्व महिला व बाल विकास अधिकारी, जिल्हा परिषद ( आयुक्तालय,ए.बा.वि.से.यो.नवी मुंबई मार्फत )
९) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी, ( आयुक्तालय,ए.बा.वि.से.यो.नवी मुंबई मार्फत )
१०) कार्यासन (व्यय-६/अर्थसंकल्प-७) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
११) कक्ष अधिकारी (का.४), महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
१२) निवड नस्ती-का-७ अ.

**शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ-२०१८/प्र.क्र.८६/का-७ अ,**
**दिनांक : १४ सप्टेंबर, २०१८ सोबतचे विवरणपत्र**

(रु. लाखात)

| अ. क्र. | लेखाशिर्ष | उद्दीष्ट | केंद्र शासनाने वेतनाकरिता मंजूर केलेला APIP | केंद्र शासनाने देय केलेला त्यांचा हिस्सा | अर्थसंकल्पित तरतूद | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | २२३६ १९०९ ( केंद्र हिस्सा ६० %) | ०१-वेतन | ३१९७८.२० | ७९९४.५५ | ५३२४.८५ | १९९८.६४ |
| २ | २२३६ १९७२ ( केंद्र हिस्सा ६० %) | ३६-सहा.अनुदाने (वेतन ) | | | १४८९९.८६ | ५९९५.९१ |
| ३ | २२३६ १९१८ (राज्य हिस्सा ४० %) | ०१-वेतन | | | ३५४९.९० | २४८४.९३ |
| ४ | २२३६ १९८१ (राज्य हिस्सा ४० %) | ३६-सहा.अनुदाने (वेतन ) | | | ९९३३.२४ | ६९५३. २७ |

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, serialNumber=4ca059ab7b8d64aaf749fe58e0a714a015f521cb28fd2204e49a4d81f12a5745, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2018.09.27 11:52:28 +05'30'

**( ला.रा.गुजर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**